**महिला व बाल विकास विभागासाठी कॉर्पोरेट सामाजिक जबाबदारी (CSR) कार्यक्रम राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१५/ प्र.क्र.३१/ का-५**
३ रा माळा, नवीन प्रशासकीय इमारत,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४००० ३२.

तारीख: २० **मे**, २०१५

**वाचा:-** महिला व बाल विकास विभागाचा शासन निर्णय क्र.एबावि-२०१३/ प्र. क्र.२८७/का-५, दिनांक १८ डिसेंबर २०१३.

**प्रस्तावना :-** महिला व बाल विकास विभागाची अनेक उद्दिष्टे जसे महिलांवर होणारे अत्याचार कमी करणे, महिलांचे सक्षमीकरण करणे, राज्यातील ० ते ६ वयोगटातील बालकांचे कुपोषण कमी करणे, लिंग भेदाचे प्रमाण कमी करणे, स्त्री भृणहत्या रोखणे, इत्यादी साध्य करण्याकरिता धोरणात्मक बदल करुन आणि प्रशासनिक व्यवस्थेचे बळकटीकरण करुन महिला आणि बाल विकास विभागाने आतापर्यंत ठोस प्रयत्न केले आहेत.

या उद्दिष्टांची पूर्तता करण्यात कॉर्पोरेट क्षेत्र अत्यंत महत्त्वाचा वाटा उचलेल अशी या विभागाची खात्री असून कॉर्पोरेट क्षेत्राची ही इच्छुकता विचारात घेऊन, विभागाशी निगडीत कॉर्पोरेट सामाजिक जबाबदारी (CSR) कार्यक्रमांच्या जलद, पारदर्शक आणि प्रभावी अंमलबजावणी करण्याकरीता विभागाने यापूर्वी संदर्भिय शासन निर्णयाद्वारे प्राथमिक धोरणात्मक संरचना अस्तित्वात आणली आहे.

**शासन निर्णय:-**

कॉर्पोरेट सामाजिक जबाबदारी (CSR) मध्ये कॉर्पोरेट क्षेत्राने स्थानिक समुदाय आणि एकंदर संपुर्ण समाजाच्या आर्थिक आणि सामाजिक विकासासाठी केलेल्या प्रयत्नांचा आणि बांधिलकीचा समावेश होतो.

महिला व बाल विकास विभाग आरोग्य, पोषण, सुरक्षा व रक्षण, सामाजिक व आर्थिक सबलीकरण, ई-गर्व्हनर्स ईत्यादी क्षेत्रांमध्ये अनेक महत्त्वाचे कार्यक्रम राबवित आहे. या महत्त्वाच्या कार्यक्रमांमध्ये काही कार्यक्रम हे नोंद घेण्यासारखे आहेत जसे की, एकात्मिक बाल विकास सेवा योजना - ICDS राज्यात लाखाहून अधिक कार्यरत अंगणवाडयांमार्फत राबविली जाते. एकात्मिक बाल विकास सेवा योजनेचे बळकटीकरण व पोषण सुधारणा योजना, कुपोषित मुलांची Line listing, महिलांकरिता कौशल्य विकास आणि रोजगार सहाय्य, बालकांसाठी अंब्रेला ट्रॅकिंग सिस्टीम , मनोधैर्य योजना, बेटी बचाओ बेटी पढाओ योजना, एकात्मिक बाल संरक्षण योजना ई. चा समावेश होतो.

विभागामार्फत महिलांसाठी भिक्षेकरी योजना, निवारागृहे, बालगृहे, विशेष गृहे, अनुरक्षण गृह, पिटा कायद्याअंतर्गत बळी पडलेल्या महिलांकरिता वसतीगृहे, अशाप्रकारे सुधारणात्मक सेवा पुरविल्या जातात.

लक्षित लोकसंख्येच्या (राज्याच्या एकूण लोकसंख्येच्या ५४% हून अधिक) सर्वसमावेशक, सुरक्षित आणि निरोगी वाढीकरिता वर नमूद कार्यक्रमांच्या अंमलबजावणीसाठी नवनवीन, वैज्ञानिक आणि प्रभावी दृष्टीकोन आखून, कॉर्पोरेट संस्था शासनाच्या प्रयत्नांमध्ये सक्रीय भागीदार होऊ शकतात.

**कार्यपध्दती**

CSR द्वारे विभागाशी भागीदारी करु इच्छिणाऱ्या सर्व कॉर्पोरेट संस्था पुढीलप्रमाणे अर्ज करू शकतात:

- CSR द्वारे विभागाशी भागीदारी करु इच्छिणाऱ्या सर्व कॉर्पोरेट संस्था विभागाच्या अधिकृत संकेतस्थळावर उपलब्ध असलेला अत्यंत सोपा ऑनलाईन अर्ज (Online Form) भरु शकतात. Online अर्ज प्राप्त झाल्यापासून २ ते ३ कार्यालयीन दिवसांत विभागातील CSR कक्ष ही पुढील कार्यपध्दतीची दिशा ठरविण्याच्या दृष्टीकोनातून अर्जदार कॉर्पोरेट संस्थेशी संपर्क साधेल. यासंदर्भातील Workflow पुढीलप्रमाणे असेल

**Process Flow for undertaking CSR initiative**




- विभाग, जिल्हा किंवा ब्लॉक स्तरावरील अधिकाऱ्यांना त्यांच्या अखत्यारीतील CSR कार्यक्रमांची अंमलबजावणी करण्याकरीता आवश्यक असलेले करारनामे करण्याचे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. उदा. एखाद्या स्वयंसेवी संस्थेला १ अंगणवाडी दत्तक घ्यावयाची असल्यास ती संस्था संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी (CDPO) / पर्यवेक्षिका / मुख्यसेविका यांच्या सोबत करार करु शकते. मात्र स्थानिक स्तरावर राबविण्यात येणाऱ्या अशा कार्यक्रमांमध्ये या अधिकाऱ्यांनी विभागाच्या CSR कक्षाचा समावेश करणे आवश्यक राहील. यासंदर्भातील वर्कफ्लो पुढीलप्रमाणे असेल.

**Alternate Process Flow for undertaking CSR initiative being carried out at Local Level**




**CSR कक्षाची भूमिका आणि जबाबदारी**

- राज्यात CSR कार्यक्रम राबविण्याकरिता ज्या कॉर्पोरेट संस्थांनी अर्ज केलेले आहेत / अर्ज करणे विचाराधीन आहे अशा संस्थांकरिता प्रथमस्तरीय संपर्क (First Level Contact) म्हणून काम करणे.
- CSR कार्यक्रमांच्या जलद, पारदर्शक आणि प्रभावी अंमलबजावणीकरिता महिला व बाल विकास विभागांतर्गत कार्यरत असणारी संबंधित आयुक्तालये, क्षेत्रिय कार्यालये आणि इतर संबंधित कार्यालये यांचे सबलीकरण करणे.
- CSR कार्यक्रमाच्या अंमलबजावणी सुधारणा करण्यासाठी येणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठी योजनाबध्द नियोजन, सुयोग्य निर्णय घेतले जातील.

- महिला आणि बाल विकास विभागाकरिता राबविण्यात येणाऱ्या CSR कार्यक्रमांचे एकूण प्रकल्प देखरेख आणि नियंत्रण (Project Monitoring & Control) करणे.

**CSR कक्षाची रचना :-**

विभागातील उप सचिव किंवा यापेक्षा वरिष्ठ दर्जाचे अधिकारी CSR कक्षाचे समन्वय अधिकारी असतील. CSR कक्षा चे समन्वय अधिकारी हे विभागामार्फत राबविल्या जाणाऱ्या CSR कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी आवश्यक मार्गदर्शन करतील तसेच समन्वय अधिकारी हे संबंधित क्षेत्रिय अधिकारी जसे आयुक्त, बाल विकास प्रकल्प अधिकारी, जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी, पर्यवेक्षिका व इतर संबंधित अधिकारी यांचेशी समन्वय साधतील.

एक तांत्रिक सहाय्य गट (Technical Support Team) समन्वय अधिकाऱ्याला सहाय्य करेल. हा गट राज्यातील CSR कार्यक्रम राबविण्याकरिता प्रकल्प व्यवस्थापनाचे सहाय्य करेल. तसेच CSR कार्यक्रमांची माहिती, धोरणात्मक माहिती आणि महत्त्वांच्या अधिकाऱ्यांशी संपर्क साधण्याकरिता आवश्यक माहिती, विभागाच्या संकेतस्थळावर उपलब्ध असल्याची खात्री करेल.

**CSR कक्षाची महत्वाची कार्ये :-**

- विशिष्ट क्षेत्रातील CSR कार्यक्रम राबविण्याकरिता आवश्यक असलेली माहिती उपलब्ध करणे. उदा. अंगणवाडयांमधील तीव्र कुपोषित बालकांची पोषण विषयक माहिती, भिक्षेकरी गृहांमधील वैद्यकिय सोईसुविधा इत्यादी.
- CSR कार्यक्रमांची आवश्यकता, सादर केलेले प्रस्ताव, त्यासाठी लागणारा कालावधी व त्याचे परिणाम या बाबींचे मूल्यांकन करुन CSR कार्यक्रम राबविण्यास परवानगी देणे.
- CSR कार्यक्रमांचे सुयोग्य व्यवस्थापन करण्याकरिता फ्रेमवर्क आणि धोरण तयार करणे.
- संबंधित आयुक्तालय, क्षेत्रीय कार्यालय आणि इतर संबधित कार्यालय यांची सुयोग्य जोडणी करुन CSR कार्यक्रमांची अंमलबजावणी करणे.
- CSR कार्यक्रमांची अंमलबजावणी चालू राहण्याकरीता तथा पूर्ण होण्याकरीता त्यांची योग्य देखरेख तथा मदत करणे.
- विभागाच्या अखत्यारीतील विविध संस्था जसे की, बालगृहे, अंगणवाडया, भिक्षेकरी गृहे, निवारा गृहे, विशेष गृहे, पिटा कायद्यांतर्गत बळी पडलेल्या महिलांकरिता वसतीगृहे, इत्यांदीमध्ये लागणाऱ्या पायाभूत व इतर सुविधा बाबतची माहिती प्रकाशित करणे.

- CSR कार्यक्रमांच्या विनिर्दीष्ट प्रगतीबाबत वेळोवेळी अहवाल सादर करणे.
- CSR अंमलबजावणीसाठी आवश्यक क्षमता आणि कौशल्य असतील असे अंमलबजावणी भागीदार शोधणे. उदा. स्वयंसेवी संस्था, युनिसेफ, जागतिक बँक, संयुक्त राष्ट्र समुह, प्रसिध्द पोषण तज्ञ, इत्यादी.
- राज्यातील आणि राज्याबाहेरील CSR कार्यक्रमांशी निगडीत सर्वोत्तम कार्यपध्दतीची (Best Practices) देवाण घेवाण करणे आणि त्यांच्या समानस्तरावर अंमलबजावणीची (Horizontal Implementation) शक्यता चाचपणे.
- प्रकल्प वेळेवर पुर्ण होण्यासाठी आवश्यक ती खातरजमा करणे आणि कॉर्पोरेट संस्थांकडून त्यांचा अभिप्राय प्राप्त करणे.

**CSR कार्यक्रम :-**

राज्यातील महिला व बाल विकास क्षेत्रात केल्या जाऊ शकणाऱ्या CSR कार्यक्रमांची सूचक यादी पुढीलप्रमाणे आहे.

- अंगणवाडी केंद्र / किचन प्रीफायब्रिकेटेड पध्दतीने/इतर नैसर्गिक साधन संपत्तीचा आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करुन बांधकाम करणे.
- अंगणवाडी केंद्रांना तथा अंगणवाडीतील लाभार्थ्यांच्या घरी सौर दिव्यांची व्यवस्था करणे.
- अंगणवाडी सेविका मदतनीस यांना मराठी भाषेत समजेल अशा, छोटया व्हीडीओ क्लीप्स प्रशिक्षणासाठी तयार करणे.
- समाजप्रबोधनासाठी बाल विकासाच्या विविध विषयाच्या अनुषंगाने नागरिकांना माहिती मिळण्यासाठी मोबाईल ॲप्लीकेशन तयार करणे.
- बालकांच्या विकासामध्ये आई/आजी/बहिण अशा विविध अंगाने भूमिका निभावणाऱ्या महिलेला सक्षम करण्यासाठी ICT आधारित व्हिडीओ क्लीप्स, मोबाईल ॲप्लीकेशन्स आणि इतर व्हर्च्युअल प्रशिक्षणाची साधने विकसित करणे.
- अंगणवाडीतील नोंदणीकृत बालके व स्तनदा माता, गर्भवती महिला यांना पोषण, आरोग्य आणि पूर्व शालेय शिक्षण या संबंधित सेवा पुरविण्याकरिता अंगणवाडी केंद्रे दत्तक घेणे.
- सामुदायिक स्वयंपाकघराच्या (Community Kitchen) माध्यमातून राज्यातील विशेषत: अतिसंवेदनशील क्षेत्र जसे की, जव्हार, मोखाडा, धडगाव, अक्कलकुआ, धरणी, चिखलदरा आणि गडचिरोली येथील बालके आणि महिलांना पोषक आहार पुरविण्यासाठी सोय करुन देणे.

- अंगणवाडी, निवारागृहे, अनुरक्षण गृहे, महिला वसतीगृहे, विशेष गृहे व इतर यामध्ये पायाभूत सुविधा जसे पिण्यायोग्य पाणी, स्वच्छ शौचालये, पंखे/हिटर, कुंपणाची भिंत, वाहतुकीसाठी रस्ते, शिक्षणाच्या सोईसुविधा, रोजगाराची सुविधा वाढविण्यासाठी साधने इत्यादी उपलब्ध करुन देणे.
- अंगणवाडी केंद्रांमध्ये सुक्ष्मपोषकयुक्त पुरक आहार, विशेष आहार, गरम ताजा आहार, आणि कडधान्य इत्यादी पुरविणे
- अंगणवाडी केंद्रांना किचन शेड, भांडी, गॅसची शेगडी, नाविन्यपूर्ण आणि पोषक अशा पाककृती पुरविणे. बालकांना सुक्ष्म पोषकांनी समृध्द असा पोषक आहार मिळावा या दृष्टीकोनातून परसबाग जोपासण्याकरिता पालकांना मदत करणे
- ६ वर्षाखालील बालकांची नियमित आरोग्य तपासणी, गर्भवती महिलांचे प्रसुतीपूर्व काळजी, प्रसुतीनंतर स्तनदा मातांची काळजी घेणे, वजन नोंदणी करणे, कुपोषणाचे व्यवस्थापन, लहान आजारांवरील उपचार, इत्यादी बाबी नियमित स्वरुपात करुन घेण्याकरिता मार्गदर्शन करणे.
- विशेष पोषण समुपदेशन आणि बाल संगोपन सत्र आयोजित करणे.
- अंगणवाडीतील लाभार्थ्यांच्या कुटुंबातील वरिष्ठ महिला, महिला PRI सदस्य, सासु-सून,किशोरवयीन मुली, ICDS शी संबंधित अधिकारी आणि स्वयंसेवी संस्था, यांची एकत्रित बैठक घेऊन Common Learning Platform तयार करणे.
- अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना व्यवसायी संस्थामार्फत प्रशिक्षण देणे.
- बालगृहे, निवारागृहे आणि भिक्षेकरी गृहे यामधील लाभार्थींकरिता कौशल्य विकासाचे कार्यक्रम राबविणे.
- बालगृहे, निवारागृहे आणि भिक्षेकरी गृहे यामधील लाभार्थींकरिता माहिती व तंत्रज्ञान आधारित शिक्षण सुविधा जसे की आभासी वर्ग(Virtual Classrooms) इत्यादी पुरविणे.
- अंगणवाडी सेविका आणि मदतनीस यांच्याकरिता कौशल्य विकास आणि कौशल्य सुधार कार्यक्रमांची व्यवस्था करणे.
- शक्य असेल तेथे सार्वजनिक, खाजगी भागीदारीचा (Public Private Partnership) वापर करणे.

कोणत्याही CSR कार्यक्रमाच्या अंमलबजावणी दरम्यान शासनाची जमिन किंवा अन्य कोणतीही मालमत्ता कॉर्पोरेट संस्थेस हस्तांतरीत केली जाणार नाही व तसेच CSR कार्यक्रम राबवितांना निर्माण होणारे कोणतेही दायित्व शासन/ विभाग घेणार नाही.

या शासन निर्णयानुसार यापूर्वीचा शासन निर्णय क्र.एबावि २०१३/ प्र. क्र.२८७/ का-५, दि.१८ डिसेंबर, २०१३ अधिक्रमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५३०११४६३५५३३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Baliram Balu Chavhan

Digitally signed by Baliram Balu Chavhan
DN: CN = Baliram Balu Chavhan, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Reason: I am the author of this document
Date: 2015.06.08 12:35:49 +05'30'

**ब. बा. चव्हाण**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (म.व बा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (म.व बा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. सर्व मा.मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
७. मा. प्रधान सचिव ( महिला व बाल विकास ) , मंत्रालय, मुंबई.
८. सर्व अ.मु. स./ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे
१०.आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई.
११.आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
१२.महासंचालक, राजमाता माता व बाल आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई.
१३.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, नवी मुंबई.
१४.आयुक्त, महानगरपालिका ( सर्व )
१५.सर्व विभागीय आयुक्त
१६.सर्व जिल्हाधिकारी.
१७.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी
१८. सर्व विभागीय उपआयुक्त, महिला व बाल विकास विभाग
१९.उपमुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण )जिल्हा परिषदा,
२०.सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
२१.सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( नागरी व ग्रामीण)

२२.ग्रंथपाल, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
२३.सर्व उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२४.सर्व अवर सचिव / कार्यासन अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२५.निवड नस्ती (कार्यासन-५)

**Regarding – Implementation of Corporate Social Responsibility (CSR) Programmes for Women and Child Development Dept.**

**Government of Maharashtra**

**Select a Department Name**

**Government Resolution No.: ICDS-2015/ C.R. 31/ Desk 5**

**Women and Child Development Department**

**3rd Floor, New Administrative Building**

**Hutatma Rajguru Chowk, Madam Cama Road**
**Mantralaya, Mumbai-400 032**

Date: **20th May 2015**

**Read :-** Women and Child Development Department's, G.R No. ICDS-2013/ C.R.287/ Desk 5 Dated 18th December 2013.

**Preamble :-** Women and Child Development Department has been investing substantial efforts in improving various aspects related to its objectives such as Reducing Crime against Women, Women Empowerment, Reducing Malnourishment amongst Children (0-6 yrs.), improving Sex Ratio, lowering Female Feticides and so on, by way of reforms to enable administrative systems to execute the necessary programs and practices.

The department firmly believes that the contribution of the Corporate Sector shall play a crucial role in achieving the key objectives of the department. The corporate bodies are willing to support the department in achieving its goals and taking this into consideration and the department has already come up with a basic policy framework for quick, transparent and effective implementation of the Corporate Social Responsibility activities pertaining to Women and Child Development Department, Government of Maharashtra.

**Resolution:-**

Corporate Social Responsibility (CSR) comprises of the efforts and commitment made by businesses to contribute to economic and social development of the local community and society at large.

The Women and Child Development Department has been working on various flagship initiatives covering key aspects of Health & Nutrition, Safety & Protection, Social & Economic Empowerment, e Governance and so on. Some of the notable examples of these initiatives include Implementation of the Integrated Child Development Scheme (ICDS) through a solid network of more than 1 Lakh Anganwadis in the state, Implementation of Strengthening of ICDS Scheme and Nutrition Improvement Programme (ISSNIP), Line Listing of Malnourished Children, Umbrella Tracking System for Children, Manodhairya Scheme, Beti Bachao Beti Padhao Scheme, Integrated Child Protection Scheme, Skill Development and Employment Assistance for Women and so on.

The department has also established a moderate network of Receiving Centers for Beggars, Shelter Homes for Women, Children Homes, Special Homes, After Care Homes, and Women's Hostels for Victims under PITA Act etc. as part of Corrective Services.

Business community can come up with innovative, scientific, efficient, effective approaches in implementing these initiatives and become an active partner in Government's efforts of providing an all-inclusive, safe, secure and healthy growth of its target population (more than 54% of the state population).

**<u>Approach:</u>**

All the interested applicants who want to partner with the department through CSR can submit their interest as follows:

- They may contact the CSR Cell at the department Department or submit very simple application form at the official website of Women and Child Development. The CSR Cell in the department would then get in touch with the interested entities for chalking

out the further course of action within 2-3 working days from the date of receipt of application. The Workflow is as follows :

**Process Flow for undertaking CSR initiative**




- It has also been decided to delegate powers to officials at the divisional, district or block level to enter into a MoU or an agreement for CSR initiatives that shall have an impact only within their jurisdiction. for e.g. If an NGO wants to adopt one Anganwadi, it may directly enter into MoU / Agreement with the respective CDPO / Supervisor. However, these officials should involve CSR cell in these activities being carried out at local level. The Workflow is as follows:

## Alternate Process Flow for undertaking CSR initiative being carried out at Local Level




### Roles and Responsibilities of CSR Cell:

- First level of contact for all corporate bodies who have applied for or are considering to carry out CSR activities in the state. The official website of the department will showcase the CSR activities carried out by these corporates so that the concept propagates all over the state
- Empowering the relevant Commissionerates, Field Officers and other relevant enablers working in the space of Women and Child Development for quick, transparent & effective implementation

- Strategic Planning, Decision Making & Resolution of issues to improve execution of CSR activities
- Overall Project Monitoring and Control for all the CSR activities for Women and Child Development Department

**Composition of the CSR Cell:**

The CSR cell will be headed by a Nodal Officer who will be of rank not less than Deputy Secretary and will be responsible for guiding and steering the CSR activities in the department. The Nodal Officer will coordinate with the Regional Officers of the department consisting of Commissioner, CDPOs, Supervisors and other relevant enablers.

The Nodal Officer would be assisted by a Technical Support Team. This team shall provide end to end project management support for implementation of CSR activities in the state and would also ensure that all the information regarding CSR activities, the policy details and contact details of various key officers is available on department's website.

**Key Functions of the CSR Cell:**

- Highlighting the information regarding requirements on CSR activities in specific areas for e.g. Nutrition Requirements in Anganwadis with Severely Malnourished Children, Medical Facilities at Beggar Homes and so on.
- Evaluation and Approval of CSR activities by reviewing the need/issues addressed as well as the proposed plan, timelines, and projected outcomes
- Preparing frameworks and strategies for management and facilitation of CSR activities
- Facilitate execution of the CSR activities by connecting to the relevant Commissionerates, Field Offices and other relevant enablers working in the space of Women and Child Development
- Monitor and support the execution and completion of CSR activities and implement actions to enable sustainability of implemented CSR activities

- Publish information regarding requirements for infrastructure or other support at various functionaries such as Children Homes, Anganwadis, After Care Homes, Beggar Homes, Shelter Homes, Special Homes, Hostels for victims under PITA Act etc.
- Provide report on a periodic basis on the progress of specified initiatives by CSR support
- Support in identifying relevant implementation/execution partners with relevant skills and capabilities required (such as NGOs, UNICEF, World Bank, UN, Nutrition Experts, etc.)
- Share best practices of successful CSR initiatives from within and outside of the State and explore the possibilities of horizontal implementation
- Ensure timely completion of projects and obtain feedback from the corporates

**CSR Activities:**

Please find below a non-exhaustive list of CSR activities that may be carried out in the space of Women and Child Development in the state.

- Use of Pre-Fabricated Structures, Natural Resources and Latest Technology in construction of Anganwadi Centers/ Kitchen
- Installation of Solar Lights in Anganwadis and in the homes of the Anganwadi Centre Beneficiaries
- Develop small Video Clips in Marathi that can be used as Training material for Anganwadi Workers and Helpers
- Develop Mobile application for Social Awareness so citizen can get information on various aspects associated with Child Development
- Develop ICT based learning material such as Video Clips, Virtual Learning Resources, Mobile Applications etc. that can be useful for empowerment of Mothers/ Sisters/ Grand Mothers who play vital role in Child Development
- Adoption of Anganwadi Centers to provide Nutrition, Health and Pre School Education related services to the enrolled children, lactating mothers and pregnant women

- Facilitate Nutritious Food through Community Kitchen to Children and Mothers in the state, particularly in High Burden Areas such as Jawhar, Mokhada, Dhadgaon, Akkalkuwa, Dharani, Chikhaldara and Gadhchiroli
- Ensure availability of basic infrastructure facilities at Anganwadis, Shelter Homes, After Care Homes, Women's Hostels, and Special Homes and so on. Basic infrastructure may include availability of potable water, Hygienic Toilets and Urinals, Fans/ Heaters, Compound Walls, Roads for commuting, educational facilities, infrastructure to increase employability etc.
- Provide Micronutrient Supplements, Special Feeds, Hot Meals, Sprouts to Anganwadi Centers
- Provide Kitchen Sheds Utensils, Gas Stove, Innovative and Nutritious Recipes to Anganwadis. Also, helping the parents cultivate kitchen gardens so the children can get micro nutrient rich diet
- Ensure regular health checkups of children under six, ante-natal care of expectant mothers, post-natal care of nursing mothers, recording of weight, management of under-nutrition, and treatment of minor ailments etc. is being carried out in a timely manner.
- Special nutrition counselling and child care sessions
- Creating common learning platforms such as joint meetings of daughters-in-law, mothers-in-law, elderly ladies of the family, adolsant girls, female PRI members, ICDS functionaries and NGOs.
- Training Anganwadi Workers (AWWs) and Anganwadi Helpers (AWHs) through professional organizations and NGOs
- Skill Development Programmes for inmates of Children Homes, Shelter Homes, Beggar Homes
- Provide ICT Based learning infrastructure such as virtual classrooms for inmates of Children Homes, Shelter Homes and Beggar Homes etc.
- Arrange for Skill Development and Skill Upgradation programs for Anganwadi Workers (AWWs) and Anganwadi Helpers (AWHs)
- Use of Public Private Partnerships wherever possible

During any of the CSR activities, no land or any other assets of the Government shall be transferred to the company carrying out CSR activities and Department will not take responsibility for any kind of liabilities during such activities.

This Government Resolution shall supersede the previous CSR G.R.No. ICDS-2013/ C.R.287/ Desk 5 dated 18th December 2013.

This Government resolution of Maharashtra Government is available at the website www.maharashtra.gov.in. Reference no. for this is 201505301146355330. This order has been signed digitally.

By order and in the name of the Governor of Maharashtra.

Baliram Balu Chavhan

Digitally signed by Baliram Balu Chavhan
DN: CN = Baliram Balu Chavhan, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Reason: I am the author of this document
Date: 2015.06.08 12:36:37 +05'30'

**B.B. Chavhan**

Deputy Secretary to the Government of Maharashtra

Copy forwarded to:-

1. Secretary of the Hon. Governor, Rajbhavan, Mumbai
2. Principal Secretary to the Hon. Chief Minister, Govt. of Maharashtra, Mantralaya, Mumbai.
3. PS to the Hon. Minister ( Women and Child Department), Mantralaya, Mumbai.
4. PS to the Hon. Minister of State ( Women and Child Department), Mantralaya, Mumbai
5. All Hon. Ministers and Ministers of State, Mantralaya, Mumbai.
6. Hon. Chief Secretary, Govt. of Maharashtra , Mantralaya, Mumbai
7. Principal Secretary, Women and Child Development Department, Mantralaya, Mumbai
8. All ACS/Principal Secretaries and Secretaries, Mantralaya, Mumbai
9. Commissioner, Women and Child Development, Pune
10. Commissioner, ICDS, Navi Mumbai
11. Commissioner, Tribal Development, Nashik
12. Director General, Rajamata Jijau Mother Child Health & Nutrition Mission, Navi Mumbai.
13. Director General, Directorate of Information and Public Relation, Government of Maharashtra, Mantralaya, Mumbai.
14. Commissioner, Municipal Corporation ( All )
15. Divisional Commissioners (All)
16 Collectors (All)
17. Chief Executive Officers (All)
18. All Divisional Dy.Commissioners ( Women & Child Department)

19. Dy. Chief Executive Officers (Child Welfare), Zilla Parishad (All)
20. District women and Child Development officer
21. All Child Development Project Officers ( Urban and Rural)
22. Librarian, Maharashtra Vidhan Mandal Sachivalaya, Mumbai
23. All Dy. Secretaries, Women and Child Development Department, Mantralaya, Mumbai
24. All Under Secretaries/ Desk OfficersWomen and Child Development Department, Mantralaya, Mumbai
25. Select File, Desk 5.